३९/१

बुधवार, दिनांक ०२ फेब्रुवारी २०११ पासून काढण्यात
येणाऱ्या साप्ताहिक **"महाराष्ट्र पुष्कराज"** सोडत
या सोडतीची सुधारित बक्षिस रचना व कार्यपध्दती

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय क्र.सोडत १००८/ प्रक्र / लॉटरी २
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८/०१/२०११

## शासन निर्णय

महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या रविवार खेरीज इतर दिवशी सध्या काढण्यात येत असलेल्या नेहमीच्या पारंपारिक सोडती व्यतिरिक्त निरनिराळया काही साप्ताहिक तसेच मासिक (भव्य) सोडती सुरु करण्याचा निर्णय घेतला आहे. आठवडयातील प्रत्येक बुधवार साप्ताहिक महाराष्ट्र पुष्कराज या नावाने साप्ताहिक सोडत सुरू करण्यात आली आहे.

मे. फ्युचर गेमिंग सोल्युशन्स् इंडिया प्रा. लि. यांची या साप्ताहिक महाराष्ट्र पुष्कराज या सोडतीची तिकीट विक्री करण्याकरिता (Selling & Marketing) करारान्वये ठोक एजंट (Bulk Agent) म्हणून शासनाने नियुक्ती केलेली आहे. या सोडतींची सर्व तिकीटे प्रस्तुत करारातील तरतुदीनुसार त्यांना विक्री करण्यात येणार आहेत. त्यांचेकडून ही तिकीटे विक्रीसाठी इतर विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

या महाराष्ट्र पुष्कराज साप्ताहिक सोडतीची सध्या काढण्यात येत असलेल्या सोडतीच्या बक्षिस रचनेत विक्रेते व ग्राहक यांच्या तसेच ठोक अभिकर्ते (Bulk Agent) यांनी सुचविल्याप्रमाणे शासनाने काही बदल करण्याचे ठरविले आहे. आता महाराष्ट्र पुष्कराज साप्ताहिक सोडतीच्या बक्षिसरचनेतील हा बदल बुधवार दि.०२ फेब्रुवारी- २०११ पासून काढण्यात येणाऱ्या सोडतीपासून अंमलात येईल.

या सोडतीसाठी प्रत्येक मालिकेत १०,००० ते ४९,९९९ या क्रमांकाची प्रत्येक मालिकेत ४०,००० याप्रमाणे पाच मालिकांत मिळून २,००,००० (दोन लाख) तिकीटे मुद्रीत करण्यात येतील. या सोडतीत पांचही मालिकात मिळून एक पहिले (सामायिक) बक्षिस रू. १० लाख ठेवण्यात आले आहे. या सोडतीमध्ये तिकिटांची किंमत प्रत्येकी रू. २०/- ठेवण्यात आलेली आहे.

साप्ताहिक महाराष्ट्र पुष्कराज सोडत ही केंद्र शासनाच्या लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केली आहे. त्यामधील प्रमुख मुद्दे खालील प्रमाणे आहेत.

१. या साप्ताहिक महाराष्ट्र पुष्कराज सोडती मध्ये A,B,C,D,E अशा ५ मालिका असून प्रत्येक मालिकेत १०,००० ते ४९,९९९ अशी ४० हजार याप्रमाणे ५ मालिकांमध्ये एकूण २,००,००० तिकीटे सोडतीकरिता छापण्यात येतील, ती वरील ठोक अभिकर्ते यांचेमार्फत सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

## २. बक्षिस रचना :-

### साप्ताहिक महाराष्ट्र पुष्कराज सोडत
### (प्रत्येक बुधवार)

५ मालिका व प्रत्येक मालिकेत ४०,००० तिकिटे
तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ४९,९९९
दिनांक : दि. ०२/०२, ०९/०२ व २३/०२/११

एकूण तिकिटे २ लाख
तिकीटांची किंमत रू.२०/-
सोडतीची वेळ : ४.३० वा.

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रूपये | प्रत्येक मालिकांत मिळून एकूण संख्या | सर्व मालिकांत मिळून एकूण संख्या | सर्व मालिकांत मिळून बक्षिसाची एकूण रक्कम रूपये |
|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १०,००,००० | -- | १ | १०,००,००० |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (२ जुळवण्या) प्रत्येक मालिकेत | ५००० | २ | १० | ५०,००० |
| तिसरे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (२ जुळवण्या) प्रत्येक मालिकेत | १००० | ८ | ४० | ४०,००० |
| चौथे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (२ जुळवण्या) प्रत्येक मालिकेत | ५०० | ८ | ४० | २०,००० |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (२ जुळवण्या) प्रत्येक मालिकेत | २०० | ८ | ४० | ८,००० |
| सहावे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (२ जुळवण्या) प्रत्येक मालिकेत | १०० | ८ | ४० | ४,००० |
| सातवे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी **दहाव्या** क्रमांकास रू. ४०/- चे बक्षिस देण्यात येईल ) | ४० | | २०००० | ८००,००० |
| **एकूण** | | | **२०१७१** | **१९२२०००** |

**३. सुपर तिकीटांसाठी बक्षिस योजना**

या महाराष्ट्र पुष्कराज साप्ताहिक सोडतीची कोणतीही २५ तिकीटे खरेदी करणाऱ्या व्यक्तीस/ग्राहकास एक सुपर तिकीट मोफत देण्यात येईल. त्यासाठी या साप्ताहिक सोडतीकरिता १००० ते ८९९९ या क्रमांकाची ८ हजार सुपर तिकीटे ठेवण्यात आलेली आहेत.

| | बक्षिसाचा क्रम | बक्षिसाची रक्कम रुपये | बक्षिसांची संख्या | एकूण बक्षिसाची रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | पहिले बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १००/- | १ | १००/- |
| २ | दुसरे बक्षिस (उर्वरित सर्व तिकीटास) | २५/- | ७९९९ | १,९९,९७५/- |
| | एकूण | | ८००० | २,००,०७५/- |

**४. सोडतीची कार्यपध्दती :-**

(अ) या सोडतीचे बक्षिस विजेते क्रमांक निश्चित करण्यासाठी सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम्स ठेवले जातील. प्रथम पहिल्या ड्रममध्ये मालिकेच्या A,B,C,D व E अशा ५ चकत्या ठेवण्यात येतील व प्रत्येक मालिकेमध्ये १०००० ते ४९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. दुसऱ्या ड्रम मध्ये फक्त १ ते ४ अंकाच्या प्रत्येकी एक याप्रमाणे चार चकत्या ठेवण्यात येतील व उर्वरित ४ ड्रममध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक याप्रमाणे दहा चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात(पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम्स एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम्स एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रम्समधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

**५.** दुसरे, तिसरे, चौथे, पाचवे, सहावे व सातवे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती पुढील प्रमाणे राहील.

**५.१ दुसरे बक्षिस रू. ५,०००/-** दुसऱ्या बक्षिसासाठी पूर्ण अंकांच्या दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररीत्या काढण्यात येईल अशी तिकीटे रू. ५,०००/- च्या दुसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**५.२ तिसरे बक्षिस रू. १,०००/-** तिसऱ्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाच्या दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररीत्या काढण्यात येईल व ज्या तिकीटांच्या शेवटी अशी जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १,०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**५.३ चौथे बक्षिस रू. ५००/-** चौथ्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाच्या दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररीत्या काढण्यात येईल व ज्या तिकीटांच्या शेवटी अशी जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**५.४ पाचवे बक्षिस रू. २००/-** पाचव्या ब्रक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाच्या दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररीत्या काढण्यात येईल व ज्या तिकीटांच्या शेवटी अशी जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**५.५ सहावे बक्षिस रू. १००/-** सहाव्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम्स मधून ४ अंकाच्या दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररीत्या काढण्यात येईल व ज्या तिकीटांच्या शेवटी अशी जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**५.६ सातवे बक्षिस रू. ४०/-:** या बक्षीसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १०व्या क्रमांकास रू. ४०/- चे सातव्या बक्षिस देण्यात येईल.

**५.७ पहिले (सामायिक) बक्षिस रू. १०,००,०००/-**

या साप्ताहिक सोडतीमध्ये **पाचही मालिकांत मिळून रूपये १० लाखाचे एक पहिले (सामायिक) बक्षीस** ठेवण्यात आलेले असून त्यासाठी प्रथमतः पाच मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ४ (अ) मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

**६.सुपर तिकीट सोडतीची कार्यपध्दती:-**

**६.१ पहिले बक्षिस रू. १००/-**

या सुपर तिकीटांचे क्रमांक १००० ते ८९९९ या प्रमाणे असल्याने या सोडतीची बक्षीसे निश्चित करण्यासाठी एकूण ४ ड्रम्स वापरण्यात येतील व ते सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ठेवण्यात येतील. सर्व चार ड्रम्सपैकी पहिल्या ड्रममध्ये १ ते ८ या क्रमांकाची प्रत्येकी (१) एक चकती या प्रमाणे ८(आठ) चकत्या टाकण्यात येतील, तर उर्वरित ३ ड्रममध्ये ० ते ९ क्रमांकाच्या प्रत्येकी एक या प्रमाणे एकूण १० चकत्या घेण्यात येऊन त्या पंचमंडळाचे समोर प्लास्टिक / रबरी आवरणात ठेवण्यात येवून त्या ड्रम्समध्ये ठेवण्यात येतील. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाचे अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यानंतर सर्व ड्रम्स फिरविण्यात येतील व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यानंतर सर्व ड्रम्स् थांबविण्यात येतील त्यातील एकच पिशवी (पाऊच) काढून त्यातील चकतीवरील अंक पंचमंडळास दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. ते अंक ज्या क्रमांने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील. या पध्दतीने रू १००/- चे पहिले बक्षिसासाठी भाग्यवान क्रमांक निश्चित केला जाईल.

**६.२ दुसरे बक्षिस रू. २५/-** दुसरे बक्षिस रू. २५/- च्या बक्षीसासाठी पहिल्या रू. १००/- बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेला भाग्यवान क्रमांक वगळून उर्वरित सर्व सुपर तिकीटांना रू. २५/- चे दुसरे बक्षिस देण्यात येईल.

**७.१** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत क्रमांकांची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेख्याची विश्वासनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**७.२** एखादे बक्षिस निश्चित करताना त्यामध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करावयाचे असतील, अशा वेळी किंवा एखादया मालिकेतील एकच क्रमांक पुन्हा आल्यास किंवा त्याची पुनरावृत्ती झाल्यास तो रद्द करून तो नवीन क्रमांक काढण्यात येईल. याबाबत पंचमंडळाचा व शासनाचा निर्णय अंतिम असेल.

**७.३** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही तिकिटावर एकच बक्षिस देण्यात येईल, बक्षिसाच्या रकमेची मागणी करताना बक्षिस विजेत्याने मूळ तिकिट शासनाकडे सादर करणे त्यास बंधनकारक राहील. याबाबत कोणताही वाद उद्‌भवल्यास याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम असेल.

**७.४** वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम्स किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक - - - - - - - - . असा आहे

(अ. मा. आत्राम)
उपसंचालक, राज्य लॉटरी तथा
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

१. राज्य लॉटरी मंडळाचे सर्व सदस्य.
२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
३. आयुक्त माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. उपसंचालक(वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी, पूर्व , मुंबई १५.
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, प्रशासन -४.
९. निवड नस्ती लॉटरी - ३.

२०११०२०८ २११ ०१ ३००१